मागासवर्गीय मुलामुलींसाठी नवीन शासकीय
<u>वसतीगृहे सुरु करणेबाबत</u>

**महाराष्ट्र शासन**
सामाजिक न्याय,सांस्कृतिक कार्य,क्रीडा व विशेष सहाय्य विभाग.
शासन ~~परिपत्रक~~ निर्णय क्र. बीसीएच- २००२/प्र.क्र. ३०१ /मावक-४,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १७ जून, २००३.

**वाचा :-** १) शासन निर्णय समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग क्रमांक बीसीएच १०८२/ १०३८५/ ३८/बीसीडब्ल्यू ४, दिनांक २६.५.१९८४

२) शासन निर्णय समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग क्रमांक बीसीएच १०८२/ १०३८५/ ३८/बीसीडब्ल्यू ४, दिनांक २४.८.१९८४

३) शासन निर्णय समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक बीसीएच २००१/ प्र.क्र.४१२/मावक ४, दिनांक १७.१.२००२

४) संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रमांक : सकसं/शिक्षण/भासशि नवीन योजना/ का.४, दिनांक २ मे, २००३.

<u>**प्रस्तावना**</u> **:-** एकविसावे शतक हे स्पर्धात्मक युग असून, या स्पर्धात्मक युगामध्ये मागासवर्गीय विद्यार्थ्यांना टिकून राहणे आवश्यक आहे. सर्वसाधारण मुलांशी स्पर्धा करणे आवश्यक आहे. मात्र आर्थिक व सामाजिक परिस्थितीमुळे विविध क्षेत्रात होणाऱ्या स्पर्धात्मक परीक्षांसाठी त्यांची जडण-घडण होणे अगत्याचे आहे. सध्या राज्यात २४३ शासकीय व २२८७ अनुदानित मुला-मुलींची वसतीगृहे कार्यरत असून, त्यामध्ये वसतीगृहात असलेल्या सोयी-सुविधा अपुऱ्या स्वरुपाच्या असल्या कारणाने विद्यार्थ्यांना विविध स्पर्धा परीक्षांच्या तयारीसाठी वाव मिळत नाही व त्यामुळे विविध स्तरावर प्रवेश परीक्षेद्वारे ज्या अभ्यासक्रमास स्पर्धा परीक्षेद्वारे प्रवेश मिळतो त्या अभ्यासक्रमात हे विद्यार्थी मागे पडतात. म्हणून या विद्यार्थ्यांना या क्षेत्रासाठी आवश्यक असणाऱ्या ज्या ज्या काही सोयी सुविधा आहेत त्या सर्व सोयी सुविधा उदा. स्पर्धा परीक्षा पूर्व प्रशिक्षण तसेच संगणकाचे प्राथमिक प्रशिक्षण इत्यादि देवून या स्पर्धात्मक परीक्षामध्ये मागासवर्गीय विद्यार्थी हे सर्वसाधारण विद्यार्थ्यांप्रमाणे कसे सक्षम होतील याबद्दलची उपाययोजना करण्याची आवश्यकता आहे.

२. मा.मंत्री, वित्त यांच्या अर्थसंकल्पीय भाषणामध्ये मागासवर्गीय कल्याणकारी विविध योजना सुरु करण्याबद्दलचा उल्लेख करण्यात आलेला आहे. त्यामध्ये प्रामुख्याने नवीन २८ शासकीय वसतीगृहे सुरु करणे, अनुसूचित जातीच्या मुला-मुलींकरीता २५३ नवीन आश्रमशाळा सुरु करणे, शासकीय वसतीगृहातील मान्यसंख्या १००० ने वाढविणे, संस्थांमधील सोयी सुविधांमध्ये वाढ करणे, मागासवर्गीय विद्यार्थ्यांना व्यावसायिक प्रशिक्षण देणे, विविध गुणवत्ता पुरस्कार तसेच विविध शिष्यवृत्ती योजनांचा उल्लेख करण्यात आलेला आहे. या योजनेमधून निश्चितच मागासवर्गीय मुलामुलींना प्रगतीचा मार्ग प्राप्त होईल. शासनाने इयत्ता १० वी व १२ वी च्या बोर्डाच्या परिक्षेत सर्वसाधारण विद्यार्थ्यांमधून प्रथम येणाऱ्या, गुणवत्ता यादीमध्ये येणाऱ्या, प्रत्येक विभागीय बोर्डामध्ये येणाऱ्या तसेच जिल्ह्यामध्ये प्रथम येणाऱ्या विद्यार्थ्यांना पारितोषिक देण्याचे जाहिर केले आहे. तसेच संपूर्ण राज्यामधून १०० गुणवत्ता धारक विद्यार्थ्यांना शिक्षणासाठी शिष्यवृत्ती देण्यात येणार आहे. तसेच १० मागासवर्गीय विद्यार्थ्यांना उच्च शिक्षणासाठी परदेशामध्ये पाठविण्यासाठी शिष्यवृत्ती देण्यात येणार आहे. या सर्वांसाठी इयत्ता ११ वी पासूनच मागासवर्गीय विद्यार्थी गुणवत्ता धारक व्हावेत म्हणून गुणवत्ता धारक विद्यार्थ्यांसाठी २८ नवीन शासकीय वसतीगृहे सुरु करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय** :- मागासवर्गीय मुलामुलींच्या शिक्षणाची सोय व्हावी म्हणून त्यांच्याकरीता वसतीगृह सुरु करण्याच्या योजनेनुसार मागासवर्गीय मुलामुलींकरीता एकूण २८ नवीन शासकीय वसतीगृहे प्रत्येकी १०० मुलामुलींच्या मान्यसंख्येसह सोबतच्या परिशिष्ट 'अ' मध्ये नमूद केलेल्या तपशिलानुसार मुलांसाठी २१ व मुलींसाठी ७ अशी एकूण २८ शासकीय वसतीगृहे सुरु करण्यास शासन मान्यता देत आहे.

२. मागासवर्गीय मुलामुलींकरीता शासकीय वसतीगृह या योजनेची नियमावली दिनांक १६ मे १९८४ अन्वये तयार करण्यात आली असून त्यामध्ये आत्तापर्यंत वेळोवेळी करण्यात आलेल्या सुधारणा संदर्भाधीन शासकीय वसतीगृहांना लागू राहील. त्या व्यतिरिक्त खालील नवीन अटी फक्त संदर्भाधीन २८ वसतीगृहांना लागू करण्यात येत आहेत.

१) सदरहू शासकीय वसतीगृहामध्ये प्रवेश देण्याकामी जिल्हा बंदीची अट लागू राहणार नाही.

२) माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षेत (इ. १० वी) ७५% गुण मिळवून विशेष प्राविण्य प्राप्त करणारे अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, विमुक्त जाती व भटक्या जमाती, विशेष मागास प्रवर्ग व आर्थिकदृष्टया दुर्बल घटकातील विद्यार्थी सदर २८ नविन शासकीय वसतीगृहामध्ये प्रवेश मिळण्यास पात्र असतील.

३) ज्या वसतीगृहामध्ये इयत्ता १० वी मध्ये ७५ टक्केपेक्षा जास्त गुण मिळालेले विद्यार्थी वसतीगृहाच्या क्षमते इतके उपलब्ध झाले नाही तर, ज्या वसतीगृहामध्ये / जिल्हयामध्ये ७५ टक्के किंवा त्यापेक्षा अधिक गुण मिळालेले विद्यार्थी उपलब्ध असतील त्या वसतीगृहामध्ये ही विद्यार्थीसंख्या हस्तांतरीत करुन वाढवून देण्यात यावी. विद्यार्थीसंख्येमध्ये बदल करण्याचे अधिकार संबंधित विभागाच्या विभागीय इ समाजकल्याण अधिकारी यांना राहतील.

४) माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परिक्षेत त्या त्या जिल्हयामध्ये ७५ टक्केपेक्षा जास्त गुण मिळविणाऱ्या विद्यार्थ्यांची यादी विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी यांनी प्राप्त करुन घ्यावी.

५) इ. ११ वी व १२ वी मध्ये शिक्षण घेणारे विद्यार्थीच फक्त प्रवेशास पात्र राहतील.

६) विशेष बाबद्वारे प्रवेश देणे हे तत्व या संदर्भाधीन वसतीगृहांना लागू राहणार नाही.

७) कॅट व जीआरई व तत्सम परीक्षेसाठी ग्रॅज्युएटनंतर पूर्व तयारी करणेसाठी विभागीय स्तरावरील वसतीगृहामध्ये १०% जागा राखीव ठेवण्यात याव्यात.

८) सदरहू वसतीगृहांना ठेकेदार पध्दतीने मेस सिस्टम चालू करण्यात येईल.

३. वरील वसतीगृहांच्या व्यवस्थापनासाठी खालील पदे उच्चस्तर समितीच्या मान्यतेच्या अधिन राहून निर्माण करुन भरण्यास शासन मान्यता देत आहे :-

| अ.क्र | पदनाम | वेतनश्रेणी | पत्येक वसतीगृहा साठी आवश्यक पदांची संख्या | एकूण पदांची संख्या |
|---|---|---|---|---|
| १ | गृहपाल | ५५००-९००० | १ | २८ |
| २ | कनिष्ठ लिपिक | ३०५०-४५९० | १ | २८ |
| ३ | शिपाई | २५५०-३२०० | १ | २८ |
| ४ | पहारेकरी | रु.३०००/- दरमहा मानधन | १ | २८ |
| ५ | सफाईगार | रु.१५००/- दरमहा मानधन | १ | २८ |
| | | | ५ | १४० |

वरील वसतीगृहाच्या गृहपालाचे वेतन व कर्मचाऱ्यांचे वेतन व वसतीगृहासाठी होणारा इतर खर्च काढण्याकरीता गृहपाल (अराजपत्रित) यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. वरील वसतीगृहे शासकीय इमारतीत सुरु करण्यात यावीत आणि त्याकरीता शासकीय इमारती उपलब्ध नसल्यास, भाड्याच्या इमारतीत सुरु करावीत. पण यापूर्वी शासकीय इमारत उपलब्ध नसल्याचे व ठरविलेले भाडे रास्त असल्याचे संबंधित कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांचेकडून आवश्यक प्रमाणपत्र घेण्याच्या बाबतीत संचालक, समाज कल्याण, पुणे यांनी आवश्यक कार्यवाही करावी.

५. याबाबत होणारा खर्च " मागणी क्रमांक एन-४, २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांचे कल्याण, ०१ अनुसूचित जातीचे कल्याण, २७७, शिक्षण पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना (वि.घ.यो.) (०१)(१३) अनुसूचित जातीतील मुले व मुली यांच्याकरीता शासकीय वसतीगृहे स्थापन करणे व त्यांचे परिरक्षण (२२२५ ३३४ २) नवीन वसतीगृहे " या लेखाशीर्षाखाली खर्ची घालून त्याखाली केलेल्या चालू आर्थिक वर्षाच्या तरतुदीमधून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४७६/०३/व्यय १४, दिनांक ४ जून, २००३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( नं. मा.शिलवंत )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
संचालक,समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी,
सर्व विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी
सर्व समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद,
सर्व जिल्हा कोषाधिकारी
महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा)मुंबई/नागपूर
वित्त विभाग, व्यय ११, मंत्रालय, मुंबई ३२
आघ्या २, अर्थसंकल्प, नियोजन,सा.न्या.सां.का.व्ही. व वि.स.वि.मंत्रालय, मुंबई ३२
निवड नस्ती नावक ४

शासन निर्णय क्रमांक - बीसीएच २००२/प्र.क्र.३०१/ मावक ४, दिनांक १७ जून, २००३ चे

परिशिष्ट - अ

| अ.क्र | विभाग | जिल्हयाचे नांव | सुरु करावयाची वसतीगृहे | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | मुले | मुली | एकुण |
| १ | कोकण विभाग, मुंबई | मुंबई | १ | १ | २ |
| | | मुंबई उपनगर | १ | १ | २ |
| | | ठाणे | १ | - | १ |
| | | नवी मुंबई | १ | - | १ |
| २ | नाशिक विभाग, नाशिक | नाशिक | १ | १ | २ |
| | | जळगाव | १ | - | १ |
| | | नंदुरबार | १ | - | १ |
| ३ | पुणे | पुणे | १ | १ | २ |
| | | पिंपरी चिंचवड | १ | - | १ |
| | | कोल्हापूर | १ | - | १ |
| | | सोलापूर | १ | - | १ |
| | | बार्शी, जि.सोलापूर | १ | - | १ |
| | | सांगली | १ | - | १ |
| ४ | औरंगाबाद विभाग, औरंगाबाद | औरंगाबाद | १ | १ | २ |
| | | लातूर | १ | - | १ |
| | | नांदेड | १ | - | १ |
| ५ | अमरावती विभाग, अमरावती | अमरावती | १ | १ | २ |
| | | अकोला | १ | - | १ |
| | | वाशिम | १ | - | १ |
| ६ | नागपूर विभाग, नागपूर | नागपूर | १ | १ | २ |
| | | गडचिरोली | १ | - | १ |
| | | एकुण | २१ | ७ | २८ |